व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांच्या अधिपत्याखालील व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, पुणे विभागातील २२०३- तंत्र शिक्षण (२२०३३४७१) या लेखाशिर्षांतर्गत अशासकीय अनुदानित संस्थेतील पूर्णवेळ शिक्षक व पूर्णवेळ शिक्षक (प्रात्यक्षिक), गट क तांत्रिक संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या सन २०२२-२३ या वर्षाकरीताच्या प्रशिक्षण कार्यक्रमाकरीता रु.६.८७ लाख या रकमेस खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक व्हीओसी-२०२३/प्र.क्र.२८/कौशल्य-२**

२ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २९ मार्च, २०२३

वाचा : १. उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्रमांक: व्हीओसी-२०१०/प्र.क्र.३०१/ व्यशि-४, दिनांक १२/०८/२०११.

२. सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक: टिआरएन-२००९/प्र.क्र.३९/२००९/ १२-अ, दिनांक २३/०९/२०११

३. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७/०४/२०१५.

४. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४/०४/२०२२.

५. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.१२/नियोजन / प्रशि.प्र.मा./२०२२-२३/३३६, दिनांक ०२/११/२०२२.

**प्रस्तावना :**

राज्य शासन सेवेत सर्व स्तरावर कार्यक्षमता वाढवून गतिमान प्रशासन होण्याकरिता राज्यातील कर्मचारीवृंद यांना प्रशिक्षण देण्याची आवश्यकता आहे.आर्थिक,सामाजिक राजकीय व तांत्रिक बदलांमुळे निर्माण होणा-या आव्हानांना सामोरे जाणे व प्रशासनामध्ये बदलासाठी आवश्यक असणारी लवचिकता साध्य करणे यासाठी सर्व स्तरावर प्रशिक्षण देणे गरजेचे आहे. संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये, “अधिकारी व कर्मचारी प्रशिक्षण शैक्षणिक साहित्याची निर्मीती व गुणवत्ता वाढ कार्यक्रम” राज्यस्तरीय सर्वसाधारण योजनेस मान्यता देण्यात आली आहे.

त्यास अनुसरून संदर्भ क्र.५ येथील पत्रान्वये, संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांनी दिलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने, प्रादेशिक कार्यालय, पुणे यांना त्यांच्या विभागातील २२०३- तंत्र शिक्षण (२२०३३४७१) या लेखाशिर्षांतर्गत अशासकीय अनुदानित संस्थेतील पूर्णवेळ शिक्षक व पूर्णवेळ

शिक्षक (प्रात्यक्षिक), गट क तांत्रिक संवर्गातील कर्मचारी यांचे प्रशिक्षण औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पुणे, सातारा व कोल्हापूर येथे आयोजित करण्याकरीता व त्याकरीता येणाऱ्या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :**

उपरोक्त विवेचन विचारात घेता, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांच्या अधिपत्याखालील प्रादेशिक कार्यालय, पुणे यांना त्यांच्या विभागातील २२०३- तंत्र शिक्षण (२२०३३४७१) या लेखाशिर्षांतर्गत अशासकीय अनुदानित संस्थेतील पूर्णवेळ शिक्षक व पूर्णवेळ शिक्षक (प्रात्यक्षिक), गट क तांत्रिक संवर्गातील कर्मचारी यांचे प्रशिक्षण औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पुणे, सातारा व कोल्हापूर येथे आयोजित करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. या योजनेतंर्गत अशासकीय अनुदानित संस्थामधील शिक्षक व कर्मचाऱ्यांस प्राधान्य देण्यात यावे.
२. प्रशिक्षण कार्यक्रम जिल्हा, विभाग किंवा प्रशिक्षणाच्या सर्व सोयी उपलब्ध असलेल्या ठिकाणी घेण्यात यावे.
३. प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये संबंधित विषयाचे अद्यावत ज्ञान, आधुनिक दृकश्राव्य साधनाचा उपयोग, सूचनात्मक साहित्य, शिकविण्याच्या नवीन पध्दती/तंत्रज्ञान, विद्यार्थी विकास व विद्यार्थी हाताळण्याच्या पध्दती, मनुष्यबळ विषयक विविध कार्यक्रम रोजगार व स्वंयरोजगाराशी निगडीत कार्यक्रम इत्यादी अंतर्भाव असावा.
४. अधिकाऱ्यांना देण्यात येणाऱ्या प्रशिक्षणामध्ये नेतृत्व विकास, संप्रेशन, प्रशासकीय व आर्थिक बाबी, विद्यार्थी हित, सुप्रशासन व व्यवस्थापकीय कौशल्य इत्यादी बाबींचा समावेश करण्यात यावा.
५. शिक्षकेतर कर्मचारी प्रशिक्षणामध्ये प्रशिक्षण, वित्तीय, भांडार व्यवस्थापन, आस्थापना विषयक प्रशासकीय बाबी हाताळणे, शासनाने विहीत केलेले नियम व त्यामध्ये वेळोवळी करण्यात आलेली दुरूस्ती, संगणक साक्षरता, आधुनिक तंत्रज्ञानाची ओळख इत्यादी बाबींचा समावेश करण्यात यावा
६. प्रशिक्षणामध्ये Industrial Training आणि In Service Training यांचा समावेश करण्यात यावा
७. आवश्यकता भासल्यास सदर प्रशिक्षणासाठी संबंधित क्षेत्रातील बाहेरील तज्ञ मार्गदर्शकांना आंमत्रित करण्यात यावे.
८. पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम व +२ स्तरावरील व्यवसाय अभ्यासक्रमांसाठी पुस्तके व इतर, Learning/Instructional Material, मॉडेल, Documentary इत्यादी तयार करण्यात यावे.
९. (अ) प्रशिक्षण कार्यक्रमाच्या खर्चाची कमाल मर्यादा प्रति प्रशिक्षणार्थी प्रति दिन रु.५००/- इतकी असून यामध्ये शैक्षणिक साहित्य, तज्ञाचे मानधन, त्यांचा प्रवास व राहण्याचा खर्च, तसेच जागेचे भाडे, स्टेशनरी, छपाई, आस्थापना भेटी व इतर सुविधांवरील खर्च यांचा अंतर्भाव राहील.

(ब) शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांच्या प्रवास व दैनंदिन भत्याचा खर्च शासनाच्या प्रचलित नियमानुसार लागू राहील.

२. या प्रशिक्षणावर होणारा खर्च रु.६,८७,०००/- (अक्षरी सहा लाख सत्याऐंशी हजार फक्त ) इतका निधी खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर खर्च हा मागणी क्र.झेडए-२, २२०३ तंत्र शिक्षण, ००३, प्रशासन ०१ शासकीय तंत्र माध्यमिक शाळा, (०१)(०१) कर्मचारी वर्गाचे प्रशिक्षण (२२०३३४७१) या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थीक वर्षाकरीता उपलब्ध असलेल्या तरतूदीतुन भागविण्यात यावा.

३. जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, पुणे या कार्यालयातील सहाय्यक संचालक (अतां) तसेच जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, सातारा या कार्यालयातील सहाय्यक संचालक (अतां) आणि जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी ,कोल्हापूर तथा आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर योजनेसाठी उपलब्ध होणारा निधी खर्च करण्याची दक्षता खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून घ्यावी.

(१) खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास विहीत कालावधीत सादर करावे.

(२) वित्त विभाग व नियोजन विभाग यांनी वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश, सूचना, परिपत्रके, अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदरहू शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७/०४/२०१५, भाग पहिला, उप विभाग-४, नियम क्र १० अन्वये भारतातील प्रशिक्षण फी वरील खर्च मंजूर करण्यास प्रशासनिक विभागास प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३२९१६५३२५८४०३ असा आहे. हा आदेश डिजीटल साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRABHAKAR A SANKHE

Digitally signed by PRABHAKAR A SANKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT ENTREPRENEURSHIP AND EMPLOYMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1bac9385344f87e77e1084162b6716914d02e353160fac64808fec76c25d6d90, pseudonym=11AF006A9B8244D291C83FCA56E433781EE9E76C, serialNumber=2F853CAC13002D53D7034663C6F0D48D3ADE65B7222B4D38B6E5902DB13A4750, cn=PRABHAKAR A SANKHE
Date: 2023.03.31 13:50:20 +05'30'

**(प्रभाकर संखे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सहसंचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, पुणे
३. संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालय, (संचालनालयामार्फत)
४. महालेखापाल (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे

६. कार्यासन अधिकारी, (प्रशा-३), कौशल्य,रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.

७. प्रधान सचिव, कौशल्य,रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.

८. निवड नस्ती (कौशल्य-२ ), कौशल्य,रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.